विशेष उल्लेखांच्या सूचनांना लेखी उत्तरे विहित
मुदतीत देण्याबाबत तसेच प्रलंबित आश्वासनांची
पूर्तता करण्याबाबत.

संसदीय कार्य विभाग
क्रमांक - विउसू -२००६/५२७/चार
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक - ५ एप्रिल २००६.

## शासन परिपत्रक

महाराष्ट्र विधानपरिषद नियम १०१(फ) मधील तरतुदीनुसार विधानपरिषद सभागृहात मांडल्या गेलेल्या विशेष उल्लेखाच्या सूचनांना लेखी उत्तरे मंत्री महोदयांच्या स्तरावर ३० दिवसांच्या आत संबंधित सदस्यांना पाठविणे आवश्यक आहे. मात्र सन २००५ मध्ये झालेल्या एकूण तीन अधिवेशनात सभागृहात उपस्थित करण्यात आलेल्या विशेष उल्लेखांच्या सूचनांना अद्याप उत्तरे मिळाली नसल्याबाबत व त्याबाबत मंत्रालयीन विभागांकडे वारंवार पत्रव्यवहार करावा लागत असल्याबाबत विधानपरिषदेच्या सध्या चालू असलेल्या अधिवेशनामध्ये मा.सदस्यांनी औचित्याचा मुद्दा उपस्थित केला. त्या संदर्भात मा.सभापती महोदयांनी तीव्र नाराजी व्यक्त केली असून, यापुढे विशेष उल्लेखांच्या सूचनांची लेखी उत्तरे नियमानुसार संबंधित सदस्यांस ३० दिवसांच्या आत देण्याबाबत निदेश दिले आहेत.

२. उपरोक्त वस्तुस्थिती लक्षात घेऊन मंत्रालयातील सर्व विभागांच्या अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिवांना अशा सूचना देण्यात येत आहेत की, सन २००५ मध्ये झालेल्या विधानपरिषदेच्या तीनही अधिवेशनात सभागृहामध्ये सदस्यांनी उपस्थित केलेल्या विशेष उल्लेखांच्या सूचनांना तात्काळ नियमानुसार सुयोग्य उत्तरे पाठवावीत. तसेच मा.सभापती महोदयांनी केलेल्या उपरोक्त निदेशास अनुसरुन यापुढे विशेष उल्लेखांच्या सूचनांना ३० दिवसांच्या आत उत्तरे पाठविण्याची कार्यवाही कृपया कटाक्षाने करावी.

३. महाराष्ट्र विधानपरिषदेमध्ये, तसेच विधानसभेमध्ये शासनातर्फे वेळोवेळी देण्यात आलेल्या आश्वासनांची पूर्तता ३ महिन्यांच्या मुदतीत करणे ही शासनाची वैधानिक जबाबदारी आहे व त्या अनुषंगाने प्रस्तुत आश्वासनांची पूर्तता जलदगतीने करण्याबाबत वेळोवेळी निदेश देण्यात येऊनही काही विभागांमध्ये प्रलंबित आश्वासनांची संख्या मोठ्या प्रमाणावर असल्याचे निदर्शनास आले आहे. तरी याबाबत मंत्रालयातील सर्व विभागांच्या अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिवांना पुन्हा अशा सूचना देण्यात येत आहेत की, प्रलंबित आश्वासनांची, विशेषत: सर्वात जुन्या असलेल्या आश्वासनांची त्वरित पूर्तता करण्याबाबत त्यांनी दि.२१ ऑक्टोबर,२००० रोजीच्या संसदीय कार्य विभागाच्या परिपत्रकान्वये दिलेल्या निदेशानुसार, प्रलंबित आश्वासनांचा आढावा घेण्याकरीता <u>नियमितपणे त्यांच्या स्तरावर</u> विभागातील संबंधित अधिकाऱ्यांच्या बैठका घ्याव्या व प्रलंबित आश्वासनांच्या संबंधीचा अहवाल मला सत्वर सादर करावा. तसेच एखाद्या आश्वासनाचा आशय लक्षात घेता, त्या आश्वासनाची पूर्तता काही कारणास्तव होऊ शकणार नाही असे आढळल्यास अशा आश्वासनाची पूर्तता करण्यापासून सूट मिळण्याकरीता <u>मंत्री महोदयांच्या अथवा अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव स्तरावर</u> आश्वासन समिती प्रमुखांशी त्वरित संपर्क साधून तशी सूट मिळवावी व आश्वासने निकाली काढावीत व त्याबाबतचा अहवाल संसदीय कार्य विभागाकडे त्वरित पाठवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(डॉ. डी. के. शंकरन)
मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,
१)सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
२)सर्व मंत्रालयीन विभाग
३)प्रधान सचिव/सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधान भवन, मुंबई-३२
४) निवड नस्ती.